**रामटेक तालुक्यातील देवलापार व पवनी या आदिवासीबहुल भागातील विद्युत यंत्रणेचे बळकटीकरण करण्याच्या कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२४ /प्र.क्र.६४ /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ जून , २०२४.

**संदर्भ :** अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी मर्या. यांचे पत्र क्र.११७३६, दि.१९.०४.२०२४

**प्रस्तावना:**

नागपूर जिल्ह्यातील रामटेक तालुक्यातील देवलापार व पवनी या आदिवासीबहुल भागाला विद्युतपुरवठा करणारी उच्चदाब वाहिनी पेंच व्याघ्र प्रकल्पाच्या जंगलभागातून जाते. त्यामुळे या भागातील वीज ग्राहकांना विशेषत: पावसाळी व वादळी वारे अशा हवामानामध्ये वारंवार अखंडीत वीजपुरवठ्यास तोंड द्यावे लागते. उपरी विद्युत वाहिनीमुळे या भागात विद्युत अपघातांची शक्यता वाढली आहे. याकरिता वीज वितरण प्रणालीमध्ये सुधारणा करणे व नूतनीकरण करणे आवश्यक आहे. सध्या अस्तित्वात असलेल्या उपरी विद्युत वाहिनी ऐवजी आवरण असलेल्या उच्चदाब विद्युत वाहिन्या वापरणे तसेच एरिअल बंच केबलसहित लघुदाब वाहिनी उभारणे या कामांमुळे ग्राहकांना अखंडीत व दर्जेदार वीज पुरवठा देणे शक्य होईल. तसेच वीज वितरण हानी व विद्युत अपघात कमी होण्यास मदत होणार आहे.

२. नागपूर जिल्ह्यातील रामटेक तालुक्यातील देवलापार व पवनी या आदिवासीबहुल भागातील विद्युत यंत्रणेचे बळकटीकरण करण्याकरिता रु.४.४० कोटी इतक्या रक्कमेचा प्रस्ताव तांत्रिकदृष्ट्या तपासणी करुन महावितरण कंपनीने सादर केला आहे. सदर प्रस्तावास आदिवासी उपयोजनेअंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. नागपूर जिल्ह्यातील रामटेक तालुक्यातील देवलापार व पवनी या आदिवासीबहुल भागातील विद्युत यंत्रणेचे बळकटीकरण करण्याकरिता रु.४.४० कोटी इतक्या खर्चाच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर कामे खालील प्रमाणे आहेत.

| अ.क्र. | तपशील | संख्या | किंमत (रु.लाख) |
|---|---|---|---|
| १. | ११ के.व्ही. उच्चदाब वाहिनी (कि.मी) | ६.३० | ५४.२४ |
| २. | १००के.व्ही.वितरण रोहित्र (नग) | १३ | ६१.८४ |
| ३. | लघुदाब एरिएल बंच केबल (किमी) | ३२.३१ | १८९.४० |
| ४. | ११ के.व्ही. उच्चदाब वाहिनी (कि.मी) (Covered Conductor for line passing through forest area) | १५.३० | १३४.४९ |
| **एकूण** | | | **४३९.९७** |

२. या योजनेसाठी होणारा खर्च मंजूर व अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीनूसार पुढील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक टी - ५
२८०१, वीज
८०, सर्वसाधारण, ७९६, जनजाती क्षेत्र योजना
(०२) जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण (२८०१ ५०८९)
कंपनी मर्यादित यांना अनुदान
(राज्यस्तरीय योजना) (कार्यक्रम)
३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान

३. सदर योजना राबविताना ऊर्जा विभागांतर्गत संबंधित क्षेत्रिय कार्यालयाने आदिवासी विकास विभागाचे संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचेशी समन्वय साधावा. तसेच प्रकल्पाची अंमलबजावणी शासनाच्या प्रचलित नियमानुसार पार पाडण्याची कार्यवाही महावितरण कंपनीने करावी.

४. हा शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व अनुक्रमे त्यांचा संदर्भ क्र.अनौ.सं.क्र.४३९/का-३, दि.१३.०५.२०२४ आणि अ.मु.स.(वित्त) अनौ.सं.क्र.५२५, दि.३०.०५.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०६२४१५३२३८९२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.06.24 15:47:34 +05'30'

**( ना.श्री.कराड )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा) यांचे प्रधान सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव
५. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, विधानभवन, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०.अ.मु.स/प्र.स/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

११.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.

१२.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर

१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.

१४.महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई

१५.कोषागार अधिकारी, जिल्हा नागपूर

१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१७.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

१८. उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१९.अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२०.कक्ष अधिकारी (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१.प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर

२२.कार्यासन अधिकारी (का-३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२३.निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२४.ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.